अनुसुचित जमातीच्या राखीव जागांवर सरळसेवेने नियुक्त / अथवा पदोन्नत झालेल्या कर्मचारी / अधिकारी यांना शासकीय /निमशासकीय सेवेत २ % आरक्षणाबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २७ मे, २००२.

संदर्भ :- १) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६ ब, दिनांक ८ डिसेंबर, १९९४
२) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६ ब, दिनांक २ जानेवारी, १९९५
३) शासन निर्णय, स.क.सा.का.व क्री.वि. क्र.सीबीसी-१४९४/प्र.क्र.२३६/मावक-५, दिनांक ७ डिसेंबर, १९९४
४) शासन निर्णय, स.क.सा.का.व क्री.वि. क्र.सीबीसी-१४९४/प्र.क्र.२३६/मावक-५, दिनांक १३ जून, १९९५
५) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६ ब, दिनांक १५ जून, १९९५

**प्रस्तावना :-** राज्यातील अनु.जाती आणि अनु.जमाती म्हणून विविक्षितपणे घोषित करण्यात आलेले जनसमुदाय वगळता अन्य काही जाती-जमाती कडून सामाजिक, आर्थिकदृष्ट्या तसेच शैक्षणिक दृष्ट्या मागासलेपणाच्या कारणावरुन "विशिष्ट सवलती देण्याची मागणी सातत्याने होत असते, अशी मागणी अनु.जमातीच्या यादीमधील ज्या जमातीचा समावेश करण्यात आलेला आहे, अशा जमातीच्या नावांशो साधर्म्य असणाऱ्या जातीकडून प्रकर्षाने होत असते. अशा समुदायांमध्ये प्रामुख्याने हलबा-कोष्टी, मच्छिमार-कोळी, सोनकोळी, मुन्नेरवार, गोवारी आणि माना यासारख्या जातींचा समावेश आहे. याबाबत शासनाने विचार करुन गोवारी, माना, कोष्टी, हलबा-कोष्टी, कोळी, तत्सम जाती, मन्नेरवार इत्यादी जाती शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक : सीबीसी-१४९४/प्र.क्र.२३६/मावक-५, दिनांक ७ डिसेंबर, १९९४ अन्वये "विशेष मागास प्रवर्ग" म्हणून घोषित केलेला आहे.

या विशेष मागास प्रवर्गासाठी सरळसेवा व पदोन्नतीमध्ये २ % आरक्षण विहित करण्यात आले तसेच अनु.जमातीच्या जाती प्रमाणपत्राआधारे शासकीय / निमशासकीय सेवेत प्रवेश मिळवून पदोन्नती मिळविलेली आहे त्यांना सेवेतून काढून टाकण्यात येवू नये अथवा पदावनत करण्यात येऊ नये असे आदेश, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी-१०९४/प्र.क्र.६८/९४/१६-ब, दिनांक १५ जून, १९९५ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत.

अनु.जमातींच्या राखीव जागांवर नियुक्त झालेल्या बिगर आदिवासी कर्मचारी / अधिकारी यांच्या बाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५ जून, १९९५ च्या शासन निर्णयान्वये संरक्षण (प्रोटेक्शन) देताना ही पदे अनारक्षित (डिरिझर्व्ह) करण्यात यावीत व अशा नेमलेल्या बिगर आदिवासी / कर्मचारी यांची आदिवासींसाठी आरक्षित कोट्यांमध्ये गणना करुन नये, अशी महाराष्ट्र राज्य जनजाती सल्लागार परिषदेच्या ४० व्या बैठकीत शिफारस करण्यात आली. सदर शिफारस शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राज्य जनजाती सल्लागार परिषदेच्या ४० व्या बैठकीतील शिफारशीवर विचार करुन अनु.जमातीच्या राखीव जागेवर नियुक्त झालेल्या विशेष मागास प्रवर्गातील कर्मचारी / अधिकारी यांच्याबाबत आता शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**(अ) ज्या बिगर आदिवासींनी राखीव जागांवर नोकरी किंवा पदोन्नती मिळविल्या त्यांना ते ज्या घटकाचे आहेत, त्यांना त्या घटकात दाखविण्यात यावे व जी रिक्त झालेली पदे आहेत ती आदिवासी जमातींमधून भरण्यात यावीत.**





कृ.मा.प. -

**(ब) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १५/६/१९९५ च्या परिच्छेद-४ मध्ये देण्यात आलेले संरक्षण दिनांक १५/६/१९९५ च्या आधी लागलेल्या कर्मचारी / अधिकारी यांनाच देण्यात यावे.**

२. हे आदेश शासकीय / निमशासकीय सेवेतील कर्मचारी / अधिकारी तसेच महामंडळे, मंडळे, महानगरपालिका, नगर पालिका, शासकीय उपक्रम, अनुदानित संस्था, विद्यापीठे, सहकारी बँका, सहकारी संस्था, शैक्षणिक अनुदानित संस्था इत्यादिंनाही लागू राहतील.

३. हे आदेश मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांच्या तात्काळ निदर्शनास आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

बा.क.अग्रवाल
अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, नागपूर, औरंगाबाद
अध्यक्ष, जिल्हा निवड समिती,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व मत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती
* पत्राने

—x—x—x—



H-356 (4000-06-02)1a.